सहकारी संस्थांसाठी अटल अर्थसहाय्य योजनेअंतर्गत महाराष्ट्र सहकार विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४४२५०७१२) ३२-अंशदाने

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन पूरक पत्र क्र.०८२३/प्र.क्र.१९०/१८-स**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक- २५ जून, २०२४

**वाचा:-**

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-१०१८/प्र.क्र.१२६/१८-स, दिनांक ०२ जानेवारी २०१९

२. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक: संकिर्ण-१११८/प्र.क्र.१२६/१८-स, दिनांक २३ जानेवारी, २०१९

३. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण ०५१९/प्र.क्र.६६/१८- स, दिनांक १७ जून, २०१९

४. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक: बैठक-१२२२/प्र.क्र.१९९/१८-स, दिनांक २३ जानेवारी, २०२३

५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२

६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा -प्रशा ५, दिनांक १० मे, २०१६

७. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन ज्ञापन क्रमांक आसुअं-२२२३/प्र.क्र.१६/२०२३/ १७-स, दिनांक १७ मार्च, २०२३

८.सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र. पूरक ०२२३/ प्र.क्र. ३५/१८-स, दिनांक-३१ मार्च, २०२३

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन वाचा क्र. १ व २ अन्वये नवीन सहकारी संस्थांच्या विशेषतः कृषी, कृषी पूरक व बिगर कृषी नाविन्यपूर्ण उद्योगांवर आधारीत प्रकल्पांना प्रोत्साहन देऊन सहकारी संस्थांच्या व्यवसाय वृध्दीसाठी अर्थसहाय्य देण्याकरीता सहकारी संस्थांसाठी अटल अर्थसहाय्य योजनेबाबत शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

प्रस्तुत योजना सहकारी संस्थांचे कृषी, कृषी पूरक व बिगर कृषी नाविन्यपूर्ण प्रकल्प यांना प्रोत्साहन देण्यासाठी अर्थसहाय्याची योजना असून सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ यांच्यामार्फत करण्यात येत आहे.

सदर योजना सन २०१९-२० मध्ये वाचा क्र.३ अन्वये सुरू ठेवण्यास मान्यता देण्यात आली होती. तद्नंतर सन २०२०-२१ ते २०२२-२३ करीता पूर्वलक्षी प्रभावाने तसेच सन २०२३-२४ करीता सदर योजनेस वाचा क्र. ४ अन्वये मुदतवाढ देण्यात आली आहे.

सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात "सहकारी संस्थांसाठी अटल अर्थसहाय्य योजना" (४४२५०७१२) अंतर्गत रू.७२.४२ कोटी इतक्या रकमेची तरतूद सं. क्र. ७, दिनांक १७/०३/२०२३ च्या शासन ज्ञापनानुसार पुनर्विनियोजनाद्वारे सुधारीत अर्थसंकल्पात उपलब्ध करून देण्यात आली आहे.

महाराष्ट्र सहकार विकास महामंडळाला शासनामार्फत उपलब्ध केलेल्या रु.७२.४२ कोटी रकमेपैकी ४२८ पात्र सहकारी संस्थांना रु.६१.०० कोटी रक्कम अनुदान स्वरुपात दिली जाणार असल्याने सदर रक्कम संबंधित संस्थांकडुन महामंडळाला परत मिळणार नाही. तसेच रु.१.४२ कोटी इतकी रक्कम महामंडळाच्या व्यवस्थापन खर्चासाठी मंजूर करण्यात आली आहे. उर्वरित रक्कम रु.१०.०० कोटी ही ४२८ पात्र सहकारी संस्थांना प्रकल्प किमतीच्या १२.५०% इतकी रक्कम कर्ज स्वरुपात वितरीत करण्यासाठी महामंडळाला देण्यात आली आहे. म्हणजेच शासनाने महामंडळास मंजूर केलेल्या एकुण रु. ७२.४२ कोटी रकमेपैकी केवळ रु.१०.०० कोटी इतकी रक्कम महामंडळास संस्थांकडुन परत मिळणार आहे. यास्तव विभागाने दि.३१ मार्च, २०२३ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२ मध्ये अंशत: सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन पूरकपत्र :-**

संदर्भ क्र.८ मधील शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२ ऐवजी खालीलप्रमाणे वाचावे.

२. अटल अर्थसहाय्य योजनेअंतर्गत ४२८ पात्र सहकारी संस्थांना प्रकल्प किंमतीच्या १२.५०% कर्ज वितरीत करण्यासाठी रू. १०००.०० लाख भागभंडवल व अनुदान रक्कम रू. ६१००.०० लाख असे एकूण रू.७१००.०० लाख आणि महाराष्ट्र सहकार विकास महामंडळाला सदर योजना अंमलबजावणीसाठी व्यवस्थापन खर्चापोटी २% प्रमाणे रू. १४२.०० लाख अशा एकूण रू. ७२४२.०० लाख रकमेचा समावेश आहे. उपरोक्त प्रमाणे महामंडळास मंजूर करण्यात आलेला निधी नेमून दिलेल्या प्रयोजनासाठीच खर्च करावा व त्याचा स्वतंत्र लेखा महामंडळाने ठेवावा.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौ.सं.क्रं.११९/का.१४३१, दि.१५.०२.२०२४ अन्वये तसेच वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौसं.क्र.२३९/२०२४/व्यय-२, दि.१५.०३.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदरचे शासन पूरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०६२५११५४५३३३०२ असा आहे. हे शासन पूरकपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH ARUN PATIL

Digitally signed by SANTOSH ARUN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=ca78467bcc4594e1e11741a7962a7a83feafb176442575037160fc343c4ae5ab, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E52439642AB57C332B2A3E3E46F0D907BA6167409EF6D52C943BF775ECF042FD, cn=SANTOSH ARUN PATIL
Date: 2024.06.25 12:05:49 +05'30'

**( संतोष पाटील )**
**अपर निबंधक तथा सह सचिव**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
३. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
४. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
५. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-१३. मंत्रालय, मुंबई
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ, पुणे
७. अवर सचिव (कार्या १७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती-१८-स.